राष्ट्रीय खाद्यतेल अभियान-तेलबिया (NMEO-OS) च्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाच्या दृष्टीने, राज्य तेलबिया अभियान (SOSM) समिती, जिल्हा तेलबिया अभियान समिती गठीत करणे व राज्य अभियान संचालक (NMEO-OS) यांच्या जबाबदाऱ्या विहित करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राखातेअ-२०२५/प्र.क्र.०९/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १६ एप्रिल, २०२५

**संदर्भ:-**

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३१/१७-अे, दि.१९/०४/२०१७
२. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-०९१९/प्र.क्र.२२१/१४-अे, दि.०४/११/२०२०
३. केंद्र शासनाचे अ.शा.पत्र क्र.१-१/२०२३- NMEO-OS (E-१२३२२३), दि.१७/१०/२०२४
४. केंद्र शासनाचे अ.शा.पत्र क्र.७-९/२०२३- NMEO-OS , दि.२३/१२/२०२४
५. केंद्र शासनाने nmeo.dac.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून दिलेल्या अभियानाच्या कार्यकारी सूचना
६.केंद्र शासनाचे पत्र क्र.F.No.०३/१३/२०२५-KY, दि.३०/१२/२०२४
७.कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र.विप्र.२/रा.खा.ते.अ/रा.जि.स्तर समिती/ प्र.क्र.१/ र-०६/२५, दि.०६/०१/२०२५

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय खाद्य तेल अभियान- तेलबिया (NMEO -OS), सन २०२४-२५ ते २०३०-३१ या कालावधीत राबविण्यात येणार असून, संपूर्ण देशासाठी एकूण रु. १०१०३.३८ कोटीची (केंद्र हिस्सा रु. ७४८१.६७ कोटी व राज्य हिस्सा रु. २६२१.७१ कोटी) इतकी तरतूद मंजूर केली आहे. याबाबतच्या सविस्तर मार्गदर्शक सूचना (Operational Guideline) केंद्र शासनाने **nmeo.dac.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करून दिल्या आहेत. त्यानुसार अभियानाअंतर्गत सोयाबीन, भुईमूग, करडई, मोहरी, कारळे, सुर्यफुल व तीळ या पिकांसाठी महाराष्ट्रातील २७ जिल्ह्यांची निवड केली आहे. अभियानाची अंमलबजावणी "मूल्य साखळी समूह (Value Chain Cluster: VCC)" पद्धतीने केली

जाणार असून, त्यासाठी प्रत्येक समुहासाठी, मूल्य साखळी भागीदार (Value Chain Partner: VCP) म्हणून संस्थेची निवड करावयाची आहे.

केंद्र शासनाच्या संदर्भीय नवीन मार्गदर्शक सूचनांच्या मसुद्यात, अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाच्या दृष्टीने, राज्य व जिल्हा तेलबिया अभियान समित्या, जिल्हा कार्यकारी समिती गठीत करण्याबाबत, तसेच, राज्य अभियान संचालक म्हणून, आयुक्त (कृषी) यांना नियुक्त करावयाचे असल्याने, त्यांच्या जबाबदाऱ्या विहित करण्याबाबत निर्देश दिले आहेत. त्याअनुषंगाने राज्य व जिल्हा स्तरावर तेलबिया अभियान समित्या व जिल्हा कार्यकारी समिती गठित करण्याची बाब, तसेच, राज्य अभियान संचालकांच्या जबाबदाऱ्या निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः**

राष्ट्रीय खाद्य तेल अभियान- तेलबिया (NMEO -OS), सन २०२४-२५ ते २०३०-३१ या कालावधीत राबविण्यात येणार असून, देशासाठी एकूण रु. १०१०३.३८ कोटीची (केंद्र हिस्सा रु. ७४८१.६७ कोटी व राज्य हिस्सा रु. २६२१.७१ कोटी) इतकी तरतूद मंजूर केली आहे. याबाबतच्या सविस्तर मार्गदर्शक सूचना (Operational Guideline) केंद्र शासनाने **nmeo.dac.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करून दिल्या आहेत. त्यानुसार अभियानाअंतर्गत सोयाबीन, भुईमुग, करडई, मोहरी, कारळे, सुर्यफुल व तीळ या पिकांसाठी महाराष्ट्रातील २७ जिल्हांची निवड केली आहे. अभियानाची अंमलबजावणी मूल्य साखळी समूह (Value Chain Cluster: VCC) पद्धतीने केली जाणार असून, त्यासाठी प्रत्येक समूहासाठी, मूल्य साखळी भागीदार (Value Chain Partner: VCP) म्हणून संस्थेची निवड करावयाची आहे.

२. केंद्र शासनाच्या संदर्भीय नवीन मार्गदर्शक सूचनांच्या मसुद्यात अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाच्या दृष्टीने राज्य व जिल्हास्तरावर तेलबिया अभियान समित्या तसेच, जिल्हा कार्यकारी समिती गठीत करण्याबाबत निर्देश दिले आहेत. त्यामुळे सदर समित्यांचे गठन होणे

आवश्यक आहे. त्यानुसार राज्य व जिल्हास्तरावरील तेलबिया अभियान समित्या व जिल्हा कार्यकारी समिती खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहेत.

**अ) राज्य तेलबिया अभियान (State Oil Seed Mission - SOSM) समिती गठीत करणे :**

अभियानाचा वार्षिक कृती आराखडा तयार करून, निधीच्या विनियोगाच्या दृष्टीने मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली राज्य तेलबिया अभियान समिती (State Oil Seed Mission-SOSM) खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | समितीमधील अधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २ | अति. मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव (कृषी) | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव (वित्त)) | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव (सहकार) | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव (ग्रामविकास) | सदस्य |
| ६ | प्रधान सचिव (अन्न व नागरी पुरवठा) | सदस्य |
| ७ | कुलगुरू - महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी | सदस्य |
| ८ | कुलगुरू - वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी | सदस्य |
| ९ | कुलगुरू - डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला | सदस्य |
| १० | कुलगुरू - डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली | सदस्य |
| ११ | कृषी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) | सदस्य |
| १२ | प्रमुख शास्त्रज्ञ - अखिल भारतीय समन्वयित संशोधन प्रकल्प -भुईमूग आणि तीळ (AICRP-All India Coordinated Research Project (AICRP) on Groundnut and Sesame) | सदस्य |
| १३ | मुख्य व्यवस्थापक, नाबार्ड | सदस्य |
| १४ | नोडल अधिकारी - राज्यस्तरीय बँकर्स समिती | सदस्य |
| १५-१६ | तेलबिया उत्पादन करणारे शेतकरी उत्पादक संघ / कंपनी / सहकारी संस्था / मूल्य साखळी भागीदार यांचे दोन प्रतिनिधी | सदस्य |
| १७-१८ | मा. अध्यक्षांनी नामनिर्देशित केलेले तेलबिया, वनस्पती तेल, बियाणे उत्पादन इ.चे दोन उद्योग प्रतिनिधी | सदस्य |
| १९ | केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण विभागाचे (DA&FW ) प्रतिनिधी | सदस्य |

| अ.क्र. | समितीमधील अधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| २० | राज्य अभियान संचालक (NMEO-OS) तथा आयुक्त (कृषी) | सदस्य सचिव |

राज्य तेलबिया अभियान (SOSM) समितीच्या रचनेमधील अध्यक्ष व सदस्य सचिव यांचे व्यतिरिक्त इतर सदस्यात बदल करण्याचे अधिकार राज्य शासनास आहेत. तसेच, सदर समितीच्या आवश्यकतेनुरूप व वर्षातून किमान दोनदा बैठका आयोजित करणे आवश्यक आहे.

**समितीची कार्यकक्षा:-**

- मार्गदर्शक सूचनाप्रमाणे दिलेल्या उद्दिष्टांची पूर्तता करण्यासाठी अभियानाची राज्यात अंमलबजावणी करून अभियानाचे पर्यवेक्षण करणे.
- राज्यासाठी निर्धारित APY लक्षांकावर आधारित तेलबिया लागवड आणि उत्पादनासाठी राज्याचा तेलबिया कृती आराखडा तयार करून त्याचे संनियंत्रण करणे.
- अभियानाच्या उद्दिष्टांनुसार संभाव्य वार्षिक कृती आराखडा अंतिम करून, मंजुरीसाठी केंद्र शासनास सादर करणे.
- मंजूर कृती आराखड्यानुसार अभियानाची राज्यात अंमलबजावणी करून, संनियंत्रण करणे.
- अत्यावश्यक पायाभूत सुविधा आणि काढणीपश्चात प्रक्रिया सुविधा इत्यादी विकसित करण्यासाठी, राज्यस्तरीय आर्थिक संसाधनांवर (Financial Resources) देखरेख करणे.
- जिल्हा तेलबिया अभियान, मूल्य साखळी भागीदार (VCPs) आणि तांत्रिक सहाय्य संस्था (TSAs) इ. च्या कामकाजाचे आणि प्रगतीचे निरीक्षण करणे आणि त्यांची कार्यक्षमता वाढवण्यासाठी सूचना व प्रमाणित कार्यपद्धती (SOPs) तयार करणे.
- अभियानाची अंमलबजावणी सुव्यवस्थितरित्या करण्यासाठी, इतर संलग्न विभागांतर्गत (जलसंपदा, वित्त, ग्रामविकास इ.) राबविण्यात येणा-या विविध केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांचा राज्य कृषि विकास धोरणांशी समन्वय साधून त्यांचे अभिसरण (Convergence) सुनिश्चित करणे.
- अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी आवश्यक असलेले निर्णय घेणे.

**ब) राज्य अभियान संचालक (NMEO-OS) यांच्या जबाबदाऱ्या :-**

- राज्याला नेमून दिलेल्या APY लक्षांकावर आधारित तेलबिया लागवड आणि उत्पादनासाठी अभियानाच्या उद्दिष्टांशी सुसंगत संभाव्य वार्षिक कृती आराखडा तयार करून सदर आराखडा राज्य तेलबिया अभियान समिती (SOSM) कडे मंजुरीसाठी सादर करणे.

- अभियानाअंतर्गत प्राप्त निधीचा सुयोग्य विनियोग करून राज्याच्या वार्षिक कृती आराखडयाची अंमलबजावणी करणे.
- अभियानाअंतर्गत करावयाच्या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी, जिल्हा अभियान अधिकारी/ कर्मचारी यांना तांत्रिक सहाय्य प्रदान करणे. तसेच, कार्यक्षम निधी वितरण करून संसाधनांचे सुयोग्य वाटप (Optimal Resource Allocation)करणे.
- राज्यामध्ये तेलबिया क्षेत्र वाढविण्यासाठी,बियाणे व्यवस्थापन व वितरण, पायाभूत सुविधांचा विकास आणि सहाय्य करुन अभियान व्यवस्थापनाचे पर्यवेक्षण करणे.
- अभियानाच्या उद्दिष्टांची पूर्तता करणेसाठी, इतर कार्यक्रमांव्दारे अभिसरणाच्या माध्यमातून (पीक विमा, सूक्ष्म सिंचन, कृषी कर्ज) NMEO-OS उपक्रम एकत्रित करुन अंमलबजावणी करणे.
- राष्ट्रीय सुकाणू समिती- तेलबिया (NSC-OS), यांना राज्याच्या कृषी-हवामानाच्या स्थितीनुसार योग्य वाणांची ओळख करून शिफारस करणे. तसेच, वार्षिक खरीप व रब्बी परिषदांपूर्वी राज्याकरिता नवीन वाणांच्या समावेशनासाठी प्रस्ताव सादर करणे.
- वेळोवेळी राज्य तेलबिया अभियान समितीचे आयोजन करणे आणि जिल्हा तेलबिया अभियान समिती आणि इतर समित्या योग्यरित्या कार्यरत असल्याची खात्री करणे.
- राज्यातील कृषी विद्यापीठे, ICAR संस्था आणि इतर नामांकित संस्था यांच्या सहकार्याने, राज्य/जिल्हा स्तरावर शेतकरी आणि इतर भागधारकांसाठी कार्यशाळा, चर्चासत्रे आणि प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करणे.

- तेलबियांवर किमान एक वार्षिक परिषद आयोजित करणे, ज्याच्या माध्यमातून जागरूकता वाढवणे, क्षमता बांधणी, नाविन्यपूर्ण कल्पना , उत्पादन वाढीचे अद्ययावत तंत्रज्ञान याबाबत प्रचार व प्रसिद्धी करावी.
- जिल्हा प्रशासन आणि मूल्य साखळी भागीदार (VCPs) यांच्याशी समन्वय साधून वेळेवर बियाणे उचल आणि वितरण करणे.
- पारदर्शकता व उत्तरदायित्व सुनिश्चित करण्यासाठी SATHI पोर्टल वर बियाणे उत्पादन व वितरणाचा मागोवा घेवून माहिती अद्ययावत करणे.
- पुढील ५ वर्षाचा बियाणे कृती आराखडा (Rolling plan) तयार करून, SATHI पोर्टल वर Upload करणे व आवश्यकतेनुरूप बियाणे उत्पादनासाठी आगाऊ करार करणे.
- कृषि विज्ञान केंद्रांव्यतिरिक्त इतर तांत्रिक सहाय्य संस्थांची (TSAs) निवड करून त्यांना नामनिर्देशित करणे व त्यांना सक्षम बनविणे.
- शेतकऱ्यांना वेळेवर तेलबिया उपलब्धता सुनिश्चित करण्यासाठी, जिल्हा अभियानाच्या मागणीनुसार त्याबाबत आगाऊ व्यवस्था करणे.
- उच्च-गुणवत्तेच्या बियाण्याच्या वाणांच्या गुणवत्तेवर देखरेख करुन त्यांचे गुणन (Multiplication) करणे, प्रमाणित बियाणे उत्पादक, बियाणे केंद्रे, संशोधन संस्था आणि शेतकरी यांच्या सहकार्याने, राज्य कृती आराखड्यात मंजूर केलेल्या बियाणे आवश्यकतेनुसार, बियाणे उत्पादन सुनिश्चित करणे.
- केंद्र शासन आणि SOSM द्वारे वेळोवेळी सोपविलेल्या इतर जबाबदाऱ्या पार पाडणे.

**क) जिल्हा स्तरावरील समित्या गठित करणे व समिती कार्यकक्षेस मान्यता मिळण्याबाबत :**

I) <u>जिल्हा तेलबिया अभियान (District Oil Seed Mission) समिती:-</u>

केंद्र शासनाच्या नवीन मार्गदर्शक सूचनेनुसार जिल्हास्तरावर अभियानाची अंमलबजावणी व संनियंत्रण करण्यासाठी जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा तेलबिया अभियान (DOSM) समिती खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | समितीमधील अधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | इतर संलग्न विभागांचे प्रतिनिधी (सहकार, जलसंपदा, फलोत्पादन) | सदस्य |
| ३ | कृषि विज्ञान केंद्र (KVK) , ICAR संस्था आणि कृषी विद्यापीठे (SAU) (सर्व) यांचा प्रत्येकी एक प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | जिल्हा प्रकल्प संचालक, आत्मा (ATMA) | सदस्य |
| ५ | अग्रणी बँक व नाबार्ड चे प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | तेलबिया उत्पादन करणारे शेतकरी उत्पादक संघ / कंपनी / सहकारी संस्थांचे दोन प्रतिनिधी (खाजगी आणि सार्वजनिक) | सदस्य |
| ७ | जिल्ह्यातील तेलबिया मूल्य साखळी भागीदारांचे (VCPs) प्रत्येकी एक प्रतिनिधी | सदस्य |
| ८ | जिल्हा अभियान संचालक (NMEO-OS) तथा जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी | सदस्य सचिव |

- जिल्हा तेलबिया अभियान समितीच्या रचनेमधील अध्यक्ष व सदस्य सचिव यांचे व्यतिरिक्त इतर सदस्यात बदल करण्याचे अधिकार राज्य शासनास आहेत.
- जिल्हा तेलबिया अभियान समितीचे अध्यक्ष, आवश्यकतेनुसार समितीच्या बैठका आयोजित करतील.

**समितीची कार्यकक्षा :-**

- जिल्हयासाठी निर्धारित APY लक्षांकावर आधारित तेलबिया लागवड आणि उत्पादनासाठी जिल्हयाचा तेलबिया कृती आराखडा तयार करणे.
- राज्याकडून जिल्ह्यासाठी मंजूर भौतिक व आर्थिक लक्षांकानुसार, जिल्ह्याचा वार्षिक कृती आराखडा तयार करून मंजुरीसाठी सादर करणे.
- मूल्य साखळी भागीदार  (VCPs) यांच्या बियाण्यांच्या मागण्या एकत्रित करणे आणि ३ वर्षांचा रोलिंग प्लॅन तयार करुन राज्य अभियान संचालकांना सादर करणे.
- निवडलेल्या व पात्र शेतकऱ्यांना बियाण्यांचे वितरण सुनिश्चित करुन, तपासणीसाठी नमुने काढणे.

- शेतकरी प्रशिक्षण / शेतीशाळा आयोजित करण्यासाठी, कृषी विज्ञान केंद्र किंवा कृषी विद्यापीठे यांसारख्या तांत्रिक सहाय्य संस्था (TSAs) यांच्याशी समन्वय साधणे.
- उत्पादकता आणि संसाधनांमध्ये वाढ करण्यासाठी, तेलबिया उत्पादक क्षेत्रामध्ये योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार, जिल्ह्यातील FPO / सहकारी / सार्वजनिक किंवा खाजगी संस्थांची मूल्य साखळी भागीदार (VCP) म्हणून निवड करणे.
- तेलबिया उत्पादक समूहामधील शेतकऱ्यांना जास्तीत जास्त मदत करण्यासाठी, राष्ट्रीय खाद्यतेल अभियान-तेलबिया सह इतर योजना जसे की, पीक विमा, सूक्ष्म सिंचन, कृषी पत धोरण इ. योजनांना एकत्र आणणे.
- तेलबिया उत्पादकता वृद्धी, बियाणे वितरण, तसेच, शेतकऱ्यांचा सहभाग इत्यादींसारख्या प्रमुख कामगिरी सूचक निर्देशांक (Key Performance Indicator) यांच्या द्वारे अभियानाच्या प्रगतीचे संनियंत्रण व मूल्यमापन करून, त्याचा अहवाल राज्य तेलबिया अभियान समितीस (SOSM) सादर करणे.
- सुधारीत लागवड तंत्रज्ञान, सुधारीत तेलबिया वाण, तसेच, काढणी पश्चात तंत्रज्ञानाद्वारे शेतकऱ्यांची क्षमता बांधणी करण्यासाठी, तांत्रिक सहाय्य संस्था (TSAs) व मूल्य साखळी भागीदार (VCPs) यांचे सहकार्याने प्रशिक्षण कार्यक्रमाची अंमलबजावणी करणे.
- केंद्र शासन आणि राज्य तेलबिया अभियान समिती (SOSM) द्वारे वेळोवेळी दिलेल्या इतर जबाबदाऱ्या पार पाडणे.

II) <u>जिल्हा कार्यकारी समिती /District Executive Committee (DEC):-</u>

केंद्र शासनाच्या नवीन मार्गदर्शक सूचनांनुसार, जिल्हास्तरावर अभियानाची अंमलबजावणी व संनियंत्रण करण्यासाठी जिल्हास्तरावर, जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा तेलबिया अभियान District Executive Committee (DEC) समिती खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे. समितीची आवश्यकतेनुसार वेळोवेळी बैठक आयोजित केली जाईल.

| अ.क्र. | समितीमधील अधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | जिल्हा अभियान संचालक (NMEO-OS) तथा जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी | सदस्य |
| ३ | जिल्हा स्तरावरील वित्त विभागाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | जिल्ह्यातील जिल्हा प्रकल्प संचालक ATMA | सदस्य |

**समितीची कार्यकक्षा :-**

- जिल्हा स्तरावर, राष्ट्रीय खाद्यतेल अभियान - तेलबिया (NMEO-OS) अंतर्गत, आद्यरेषीय समूह प्रात्यक्षिके (CFLD) आणि पीक प्रात्यक्षिके, मूल्य साखळी भागीदार (VCPs) आणि योजनेच्या इतर सर्व खर्चाशी संबंधित बाबींना मंजुरी देणे व संनियंत्रण करणे.
- जिल्ह्यातील विशिष्ट पिकांनुसार, मूल्य साखळी भागीदार (VCPs) ची निवड करून समूह तयार करणे.
- योजनेच्या दैनंदिन कामकाजाबाबत संनियंत्रण करणे .
- काढणी पश्चात पायाभूत सुविधा जसे कि संकलन, काढणी आणि प्रक्रियेसाठी युनिट्सची स्थापना करण्यासाठी प्रकल्प निवड करून मंजुरी देणे.
- तेलबिया-उत्पादक क्षेत्रांमध्ये, उत्पादकता आणि संसाधनांमध्ये वाढ करण्यासाठी, योजनेच्या मार्गदर्शक तत्त्वांचे पालन करून जिल्ह्यातील FPO, सहकारी, सार्वजनिक किंवा खाजगी संस्था यांची, मूल्य साखळी भागीदारी (VCPs) म्हणून निवड करणे.
- कृषी विज्ञान केंद्र (KVKs), राज्य कृषी विद्यापीठे (SAUs), राज्य कृषी व्यवस्थापन आणि विस्तार प्रशिक्षण संस्था (SAMETIs) इ. सारख्या तांत्रिक सहाय्य संस्था (TSAs), यांची निवड करून त्यांच्याद्वारे शेतकरी प्रशिक्षण आणि शेतकरी शेतीशाळा (FFSs) आयोजित करणेबाबत समन्वय साधणे.
- मूल्यसाखळी भागीदारांचा वित्तीय आढावा व लेखा परीक्षणासह निधी वापराचे संनियंत्रण करणे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक२०२५०४१६१८४८११५९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2025.04.16 18:49:21 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१.मा. मंत्री (कृषि)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२.मा.विरोधी पक्ष नेता ,विधानसभा ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई.
३.मा.विरोधी पक्ष नेता ,विधानपरिषद ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई.
४.मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५.अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६.अपर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग ,मंत्रालय, मुंबई.
८.प्रधान सचिव (कृषि) ,कृषि व पदुम विभाग ,मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (सहकार), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (ग्रामविकास), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव (अन्न व नागरी पुरवठा), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३.जिल्हाधिकारी (सर्व)
१४.महासंचालक, महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
१५.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
१६.कुलगुरू, सर्व कृषी विद्यापिठे.
१७.मुख्य महाव्यवस्थापक, नाबार्ड बँक, मुंबई.
१८.महा व्यवस्थापक अग्रणी बँक (सर्व)
१९.प्रमुख शास्त्रज्ञ, अखिल भारतीय समन्वयित संशोधन प्रकल्प -भुईमूग आणि तीळ.
२०.सहसचिव, कृषी व शेतकरी कल्याण विभाग, (DA&FW ) नवी दिल्ली.
२१.महाव्यवस्थापक, राज्यस्तरीय बँकर्स समिती, शिवाजीनगर,पुणे.
२२.संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.

२३. प्रकल्प संचालक, आत्मा (सर्व)
२४. कृषी विज्ञान केंद्रे, (सर्व)
२५.सर्व विभागीय कृषी सहसंचालक.
२६.सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी.
२७.महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा), मुंबई.
२८.महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर.
२९.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर.
३०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
३१.सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे.
३२.वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई.
३३.निवड नस्ती-४अे.